**सन २०२३-२४ वनविकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमामधून वित्त व्यवस्थापन करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) या योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१५२/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २६ मार्च, २०२४

वाचा-:

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०९.१०.२०२३, १९.१०.२०२३ व २७.०२.२०२४
३. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष- १/पी/यो/चाबाप/प्र.क्र.४०/११७६/२०२३-२४, दिनांक २२.०३.२०२४

प्रस्तावना-:

सन २०२३-२४ करीता वनविकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमामधून वित्त व्यवस्थापन करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) या योजनेंतर्गत रुपये ७००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वाचा येथील नमूद क्र.२ येथील शासन निर्णयान्वये उपशिर्षनिहाय रु.३९८.९० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील नमूद क्र.१ येथील दिनांक १२.०४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतूदींचा उर्वरित संपूर्ण निधी सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत विविध उद्दिष्टांसाठी निश्चित केलेल्या मर्यादेनुसार बीम्स प्रणालीवर त्या त्या उद्दिष्टांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

त्याअनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून वाचा क्र. ३ येथील नमूद पत्रान्वये अमरावती, गडचिरोली व धुळे या वनवृत्तातील वन विभागाकरीता ४४०६-०१७१ या लेखाशिर्षांतर्गत २१-साहित्य पुरवठा अंतर्गत रु.२५.२६ लक्ष व ०२-मजूरी अंतर्गत रु.६७.६७ लक्ष असा एकूण रु.९२.९३ लक्ष इतक्या रकमेचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदर प्रस्तावांसाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे वाचा नमूद क्र. ३ येथील पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव, वित्त विभागाचे दिनांक १२.४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४ रोजीचे परिपत्रक व बीम्स प्रणालीवरील निधी उपलब्धता विचारात घेता, वनविकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमामधून वित्त व्यवस्थापन करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) या योजनेतून खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार सन २०२३-२४ करीता ०२-मजुरी अंतर्गत रु.६७.६७ लक्ष व २१- पुरवठा व सामुग्री अंतर्गत रु.२५.२६ लक्ष असा एकूण रु.९२.९३ लक्ष इतका निधी खालील विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| अ. क्र | वनवृत्त | वनविभाग | ०२-मजूरी | २१-पुरवठा व सामुग्री | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा एकूण निधी (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| १ | मु.व.सं.(प्रा.) अमरावती | अमरावती | ०.०० | ६.०९ | ६.०९ |
| | | मेळघाट प्रा. वन विभाग, परतवाडा | ०.०० | ६.५१ | ६.५१ |
| | | अकोला | ०.०० | ५.१७ | ५.१७ |
| | | बुलढाणा | ०.०० | ७.२८ | ७.२८ |
| | | निर्देशन विभाग | ०.०० | ०.२१ | ०.२१ |
| २ | गडचिरोली | उपवनसंरक्षक, सिरोंचा | १५.०४ | ०.०० | १५.०४ |
| ३ | वनसंरक्षक (प्रा.) धुळे | उपवनसंरक्षक, यावल वनविभाग, जळगांव | ५२.६३ | ०.०० | ५२.६३ |
| | **एकूण:-** | | **६७.६७** | **२५.२६** | **९२.९३** |

**अटी व शर्ती**-:

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

४. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतुदीपक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

५. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पिय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तीचे पालन करावे.

७. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलच्या कार्यपध्दतीचा आवश्यकतेनुसार निविदा प्रक्रियेत ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

८. सदर आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

९. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

१०.संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा. महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

११.उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१२.सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१३.सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.०९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१४.सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतुदी तसेच प्रचलित कायदे व नियम मधील तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च रिट याचिका क्रमांक १२७७/२००० मध्ये मा. मुंबई उच्च न्यायालयाचा नागपूर खंडपीठाने दिलेल्या आदेशानुसार वनसंरक्षणासाठी प्रधान शिर्ष- ४४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०२ सामाजिक व क्षेत्र वनीकरण, (०८)(०१) वनविकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमामधून वित्त व्यवस्था करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनिमय,भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१७५२१५४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db75
5d4af91632f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76
102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.03.26 18:08:31 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), अमरावती, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती,
५. वनसंरक्षक (प्रा.), धुळे
६. महालेखापाल- १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
७. वित्त विभाग, व्यय- १० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.निवडनस्ती